**चेंबूर ट्रॉम्बे एज्यूकेशन सोसायटी कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, चेंबूर, मुंबई या संस्थेला शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून वास्तुशास्त्र पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता वाढविण्यास शासन मान्यता देण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.टीईएम -२०१७/प्र.क्र.३०१/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०००३२.
दिनांक: २७ जुलै, २०१७

संदर्भ :- १) रजिस्टार, वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक CA/5/Academic-MH77, दिनांक ११/०७/२०१७
२) संचालक, तंत्र शिक्षण यांचे पत्र क्रमांक २/एनजीसी/मान्यता/ २०१७/८३१, दि. २१/०७/२०१७

**प्रस्तावना :-**

शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी चेंबूर ट्रॉम्बे एज्यूकेशन सोसायटी कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, चेंबूर या वास्तुशास्त्र महाविद्यालयातील वास्तुशास्त्र पदवी अभ्यासक्रमाची प्रवेशक्षमता ४० वरुन ८० करण्यास संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये मान्यता दिली आहे. त्यानुसार शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये प्रवेशक्षमता वाढीस दिलेली मान्यता विचारात घेऊन संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे खाली नमूद केलेल्या संस्थेस शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून प्रवेश क्षमता वाढीस खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | महाविद्यालयाचे नाव | अभ्यासक्रम | प्रवेशक्षमता |
|---|---|---|---|
| १. | चेंबूर ट्रॉम्बे एज्यूकेशन सोसायटी कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, एन.जी.आचार्य मार्ग, चेंबूर, मुंबई - ४०० ०७१ | वास्तुशास्त्र पदवी | ४०-८० |

१) सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२) प्रस्तुत बाबतीत वास्तुकला परिषदेने विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेक्षक्षमता विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणे राहील.

३) शासनाने विहित केलेल्या तसेच वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम,२०१६ मधील तरतूदीनुसार संबंधीत विद्यापीठाची मान्यता/ संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६) सदर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७) शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संस्थेने आकारल्यास संस्थेवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचा-यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके वास्तुकला परिषदेच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. .तसेच विद्यार्थ्यांना वास्तुकला परिषदेच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१०) रॅगिंग संदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट,१९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

११) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व मुंबई विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१२) संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नसल्यास, संस्थेकडून संचालकांनी अंतिम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०७२७१२४६०१८३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Madan Maruti Morve

Digitally signed by Madan Maruti Morve
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2efbf911362ce57b361b7f36471cb98eb98ed47e7de8b061211b9d7e6e0fc2e3, cn=Madan Maruti Morve
Date: 2017.07.27 17:18:50 +05'30'

**(म. मा. मोरवे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण, विभागीय कार्यालय, मुंबई (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
३. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, फोर्ट, मुंबई
४. प्राचार्य, चेंबूर ट्रॉम्बे एज्यूकेशन सोसायटी कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, एन.जी. आचार्य मार्ग, चेंबूर, मुंबई - ४०० ०७१
५. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
७. रजिस्ट्रार, वास्तुकला परिषद, इंडिया हॅबीटॅट सेंटर, कोअर-६ए, पहिला माळा, लोधी रोड, नवी दिल्ली-११० ००३
८. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली
९. निवड नस्ती / तांशि-४